महिला व बाल विकास विभागांतर्गत क्षेत्रिय आस्थापनेवरील गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्या (सन २०२३-२४).

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक : मबाआ-२०२३/प्र.क्र.१५/का.७**
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. ३० जून, २०२३.

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम -२००५ मधील कलम ४ (१), (२) व (३) तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने या विभागातील जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना.), जिल्हा कार्यक्रम अधिकारी (मवबावि) जि.प., सहायक आयुक्त, परिविक्षा अधिक्षक या गट-अ संवर्गातील खालील अधिकाऱ्यांची स्तंभ क्र. ४ येथे दर्शविलेल्या ठिकाणी सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव सध्याचे पद व कार्यालय | बदलीनंतरचे पद | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.आर.एम.टेटे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना.), चंद्रपूर-दक्षिण | सध्याच्या पदावर मुदतवाढ. | --- |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. उपरोक्त अधिकारी यांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी बदलीच्या ठिकाणी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करून त्यांना बदलीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते बदलीच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास wcd-desk07@gov.in या ई-मेल वर त्वरीत कळवावे.

३. उपरोक्त अधिकारी यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

४. उपरोक्त अधिकारी यांना पुर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करू नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने त्यांचा कोणत्याही प्रकारचा रजेचा अर्ज स्विकारू नये.

५. उपरोक्त अधिकारी यांना बदलीच्या पदावर रूजू करून घेताना, ते रजेवर /गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करून घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करून घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरून घ्यावा आणि नंतर हजर करून घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी प्रसृत केलेल्या शासन निर्णय/परिपत्राकांतील निर्देशांचे पालन करावे.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेततर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, उपरोक्त अधिकारी यांनी बदलीच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या ठिकाणी रूजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यादिन (dies non) म्हणून गणला जाईल.

७. उपरोक्त अधिकारी यांची बदली ही प्रशासकीय बदली असल्याने त्यांना प्रवास भत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय राहतील.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६३०१९४५३२५८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAJENDRA T BHALWANE

Digitally signed by RAJENDRA T BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA T BHALWANE
Date: 2023.07.04 16:30:53 +05'30'

**( रा. ता. भालवणे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई.
३. मा. मंत्री, (म.व बा.वि.वि.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. सचिव, (म.व बा.वि.वि.), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. संबंधित विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास विभाग (आयुक्तालयामार्फत)
६. महालेखापाल १ /२ (लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, मुंबई/नागपूर (आयुक्तालयामार्फत)
७. संबंधित अधिदान व लेखाधिकारी/जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
८. संबंधित अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
९. निवडनस्ती (कार्यासन-७).